कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाची असलेली हेल्पलाईन पुढे चालू ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**कौशल्य विकास व उदयोजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः कौविउ-२०१५/प्र.क्र.२७१/रोस्वरो-१**

२ रा मजला, मंत्रालय मुख्य इमारत, मादाम कामा मार्ग,

हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई ४०० ०३२

तारीख: २३/१०/२०१५

वाचा -

१) आयुक्त,कौशल्य विकास ,रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र. कौविरोवउसं-७/२२२(१४/१)/८१८१ दि.०९ ऑक्टोबर,२०१५

२) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र.कौविरोवउसं-७/२२२/(१४/१)/८३४७ दि.१६ ऑक्टोबर,२०१५

३) आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, नवी मुंबई यांचे पत्र क्र.कौविरोवउसं-७/२२२/(१४/१)/८३९५ दि.२० ऑक्टोबर,२०१५

प्रस्तावना -

सर्वकष इ-प्रशासन प्रणाली प्रकल्पांतर्गत आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयासाठी विकसित केलेल्या www.maharojgar.gov.in या वेबपोर्टलद्वारे उमेदवार, उद्योजक, प्रशिक्षण संस्था, शासनाचे विविध विभाग, शासनाच्या स्वयंरोजगार योजना राबविणारी महामंडळ, सेवा पुरविणारे व सेवा घेणारे इ. लाभार्थी घटक यांना रोजगार, स्वयंरोजगार व प्रशिक्षणाबाबतच्या विविध सेवा सुविधा उपलब्ध करुन देण्यात आलेल्या आहे. सदर लाभार्थी घटकांना या सेवाचा लाभ घेतांना काही अडचणी असल्यास त्यांचे निराकरण व त्यांना सहाय्य करण्यासाठी दि.२३ जुलै,२०१४ पासून हेल्पलाईन ( १८६०२६६०१६६ ) सुरु करण्यात आली होती. सदर सेवा मे.सीएमसी लि, पुणे यांचेमार्फत प्रकल्पाचा भाग म्हणून उपलब्ध करुन घेण्यात आली होती. सदर हेल्पलाईनचा कालावधी दि.२२ जुलै,२०१५ रोजी संपुष्टात आला आहे. लाभार्थींच्या हितास्तव तात्पुरती व्यवस्था म्हणून सदर हेल्पलाईनला संचालनालयाच्या स्तरावर दि.२२ ऑक्टोबर,२०१५ पर्यन्त मुदतवाढ देण्यात आली आहे. दि.१४.०९.२०१५ रोजी पार पडलेल्या कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या प्रकल्प अंमलबजावणी समितीत सदर हेल्पलाईन पुढे चालू ठेवण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. तसेच सदर बैठकीत हेल्पलाईन यापुढे माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभागाने निविदा प्रक्रिया करुन नागरिकांसाठी हेल्पलाईन म्हणून कार्यान्वित केलेल्या सिटीझीन कॉन्टॅन्ट

सेंटरद्वारे पुढे चालू ठेवण्याचा निर्णय घेण्यात आला. सदर सेटर सध्या सार आयटी रिसोर्सेस प्रायव्हेट लिमिटेड यांचे मार्फत कार्यान्वित आहे. सबब, सदर निर्णयास अनुलक्षून कौशल्य विकास व उद्योजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाची सदर हेल्पलाईन सिटीझन कॉन्टॅन्ट सेंटर द्वारे चालू ठेवण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय-**

दि.१४.०९.२०१५ रोजी झालेल्या संगणकीकरण प्रकल्प अंमलबजावणी समितीच्या बैठकीत दिलेल्या मान्यतेनुसार दि.२३ ऑक्टोबर,२०१५ पासून कौशल्य विकास व उदयोजकता विभागाच्या अधिनस्त असलेल्या कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालयाची हेल्पलाईन माहिती तंत्रज्ञान विभागाने निविदा प्रक्रिया करुन नागरिकांसाठी हेल्पलाईन म्हणून कार्यान्वित केलेल्या सिटीझन कॉन्टॅन्ट सेंटरचा वापर करुन ( सार आरयटी रिसोर्सेस प्रायव्हेट लिमिटेड यांचेमार्फत कार्यान्वित करुन ) पुढे चालू ठेवण्यास व तसेच यासाठी सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षामध्ये होणा-या खर्च रु.७,२५,०४०/- (रु.सात लाख पंचवीस हजार चाळीस फक्त) ला प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१५-२०१६ या आर्थिक वर्षात संगणकीकरणासाठी अर्थसंकल्पीत/मंजूर अनुदानातून लेखाशीर्ष : मागणी क्रमांक झेड-१, २२३० कामगार व सेवायोजन ०२, सेवायोजन सेवा, ००१ संचालन व प्रशासन (०२) (०१) सेवायोजन कार्यालयात संगणित्राची पध्दती सुरु करणे ( २२३०१०९२),१३ कार्यालयीन खर्च (योजनांतर्गत) या लेखाशीर्षातून भागविण्यात यावा.

३. शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनिमय, भाग-२, दिनांक १७ एप्रिल,२०१५ प्रमाणे वित्तीय नियमपुस्तिका,१९७८ भाग-पहिला, उप विभाग तीन अ.क्र.४ परिच्छेद २७(२)(ब) अन्वये प्रशासनिक विभागास असलेल्या अधिकारान्वये प्रशासकीय विभागास असलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय यांना सूचित करण्यात येते की, प्रकरणी पुढील सर्व कार्यवाही करतांना खालील बाबीचे काटेकोरपणे पालन करावे .

१)उपलब्ध निधीच्या मर्यादेत राहून खर्च करण्यात यावा.

२ )प्रकरणी कार्यवाही करतांना माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभागाने वेळोवेळी दिलेल्या सूचनाचे तंतोतत पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५१०२६१०५६३२६००३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sandesh Chhabu Tadvi

Digitally signed by Sandesh Chhabu Tadvi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sandesh Chhabu Tadvi
Date: 2015.10.26 11:02:55 +05'30'

**(सं.छ.तडवी)**

अवर सचिव

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ ( लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), मुंबई/नागपूर
२. प्रधान सचिव, माहिती तंत्रज्ञान, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय,मुंबई
३. कक्ष अधिकारी ( रोस्वरो-२), कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय,मुंबई
४. वित्त विभाग ( व्यय-६),मंत्रालय, मुंबई
५. नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
६. आयुक्त, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता संचालनालय, कोकण भवन, नवी मुंबई
७. जिल्हा कोषागार अधिकारी,जिल्हा कोषागार कार्यालय, ठाणे
८. अपर कोषागार अधिकारी, उप कोषागार कार्यालय, कोकण भवन, नवी मुंबई
९. निवड नस्ती/रोस्वरो-१.